दि.०१ ऑगस्ट, २०२४ ते दि.१५ ऑगस्ट, २०२४ या कालावधीत "पशुसंवर्धन पंधरवडा" आयोजित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०२४/प्र.क्र. ४३/पदुम-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :-३१ जुलै, २०२४.

**प्रस्तावना:-**

कृषि व्यवसायापासून मिळणाऱ्या एकूण राष्ट्रीय सकल उत्पन्नाच्या २६ टक्के व देशाच्या एकूण राष्ट्रीय सकल उत्पन्नाच्या ४.११ टक्के वाटा पशुपालन व्यवसायाचा आहे. तथापि पशुपालन व्यवसायामध्ये उत्पन्न वाढविण्याच्या दृष्टिने अधिक क्षमता असून सदर क्षमतेचा पुरेपुर वापर होत नाही. यामागच्या प्रमुख कारणमीमांसेचा शोध घेतला असता पशुपालकांकडुन पशुधनाच्या आरोग्याकडे होत असलेले दुर्लक्ष तसेच पशुधनाची उत्पादकता वाढविण्यासाठी भाकड काळ कमी करणे तसेच उच्च उत्पादन क्षमता असलेल्या प्रजातीच्या वंशावळीत वाढ करण्यासाठी कृत्रिम रेतनाचा अवलंब करण्याबाबत पशुपालकांमध्ये असलेली अनभिज्ञता हे असण्याचे प्रकर्षाने दिसून आले आहे.

राज्यातील पशुधनाची पुर्ण उत्पादनक्षमता वापरात आणणे तसेच उत्पादन क्षमतेत वाढ करण्याच्या दृष्टीने पशुपालकांमध्ये जागरुकता निर्माण करण्याची प्राथमिक गरज आहे. याचबरोबर पशुपालन व्यवसाय फायदेशीरपणे करण्यासाठी प्रोत्साहन देण्याचीही आवश्यकता आहे.

सदर व्यवसाय व्यावसायिक दृष्टीकोनातून फायदेशीर ठरण्यासाठी पशुजन्य पदार्थ (उदा.मांस, लोकर, अंडी इ.) तसेच दुध व दुग्धजन्य पदार्थांचे उत्पादन, खरेदी, विक्री यासारख्या फॉरवर्ड व बॅकवर्ड लिंकेजची माहिती पशुपालकांना करुन देणे आवश्यक आहे. जेणेकरुन पशुपालन हा व्यवसाय केवळ शेतीपुरक अथवा जोडधंदा न राहता तो पशुपालकाचा उत्पन्नाचा मुख्य स्त्रोत होईल या दृष्टीकोनातून पशुपालन उद्योजकता निर्माण करण्याची आवश्यकता आहे. त्यासाठी "उच्च उत्पादन क्षमता असलेल्या वंशावळीची पैदास, पशुस्वास्थ, पशुखाद्य, पशुचारा व व्यवस्थापन" या पंचसुत्रीची अंमलबजावणी पशुसंवर्धन विभागाकडुन करण्यात येत आहे. सदर पंचसुत्री पशुपालकांपर्यंत पोहचविण्यासाठी दि.०१.०८.२०२४ ते दि.१५.०८.२०२४ या कालावधीत "पशुसंवर्धन पंधरवडा" आयोजित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

राज्यातील पशुधनाच्या उत्पादक क्षमतेचा पुरेपुर वापर करुन पशुपालनापासून मिळणाऱ्या उत्पन्नाद्वारे राष्ट्रीय सकल उत्पादनात भर टाकण्याची आवश्यकता विचारात घेऊन राज्यात सदर पशुउद्योजकता निर्माण करण्यासाठी पशुसंवर्धन विभाग कार्यरत आहे. त्यासाठी विभागाकडून "उच्च उत्पादन क्षमता असलेल्या वंशावळीची पैदास, पशुस्वास्थ, पशुखाद्य, पशुचारा व

व्यवस्थापन” या पंचसुत्रीची अंमलबजावणी करण्यात येत आहे. सदर पंचसुत्रीच्यासंदर्भात पशुपालकांमध्ये जागृती निर्माण करणे तसेच सदर पंचसुत्रीची प्रभावी अंमलबजावणी करण्याच्यादृष्टीने संपुर्ण राज्यात दि.०१.०८.२०२४ ते दि.१५.०८.२०२४ या कालावधीत “पशुसंवर्धन पंधरवडा-२०२४” आयोजित करण्यास मान्यता देण्यात येत असून त्यानुसार पुढील कार्यवाही करावी.

१. या कालावधीत सोबतच्या परिशिष्ठात नमुद केल्याप्रमाणे कार्यक्रम राबविण्यात यावेत.
२. पशुसंवर्धन पंधरवड्यादरम्यान सर्व पशुपालकांचा सहभाग अपेक्षित असल्याने सदर पंधरवड्याची माहिती सर्व पशुपालकांना व्हावी यासाठी व्यापक स्वरुपात प्रसिध्दी देण्यासाठी पशुवैद्यकीय दवाखाने, शासकीय कार्यालये, ग्रामपंचायत, कृषि उत्पन्न बाजार समिती, आठवडी बाजार ठिकाण इ. ठिकाणी नियोजित कार्यक्रमांचे प्रसिध्दी फलक लावण्यात यावे.
३. परिशिष्ठात नमुद केलेल्या कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी गावपातळीवर शिबीरे/कार्यशाळा/ व्याख्याने/ तज्ञांचे मार्गदर्शन/ यशस्वी पशुपालकांचे अनुभव कथन यासारख्या उपक्रमांचे आयोजन करण्यात यावे.
४. राज्यात आयोजित करण्यात येणाऱ्या पशुसंवर्धन पंधरवड्यादरम्यान दैनंदिन कार्यक्रमांचे संयोजन व संनियंत्रण आयुक्त पशुसंवर्धन यांनी करावे.
५. पशुसंवर्धन पंधरवड्याच्या अनुषंगाने आयोजित केलेल्या कार्यक्रमांच्या फलनिष्पत्तीबाबतचा छायाचित्रासह वस्तुनिष्ठ अहवाल सर्व प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त यांनी आयुक्त पशुसंवर्धन यांच्यामार्फत दि.२१.०८.२०२४ पुर्वी शासनास सादर करावा.

यासाठी येणारा खर्च त्या-त्या कार्यालयासाठी संबंधित प्रयोजनासाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक सांकेताक २०२४०७३११६५६१८४२०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने,

NIWRUTTI BHAGUJI MARALE

Digitally signed by NIWRUTTI BHAGUJI MARALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=NIWRUTTI BHAGUJI MARALE
Date: 2024.07.31 17:11:45 +05'30'

**( नि. भा. मराळे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व जिल्हाधिकारी
४. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे.
५. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय (प्रसिध्दीसाठी)

६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, नागपूर
८. व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे
९. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन.
१०. मा. मंत्री (पशुसंवर्धन) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती, पदुम-२

## शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०२४/प्र.क्र. ४३/पदुम-२,दिनांक :-३१ जुलै, २०२४ चे परिशिष्ठ

## दि.०१.०८.२०२४ ते दि.१५.०८.२०२४ या कालावधीतील "पशुसंवर्धन पंधरवडा-२०२४" मध्ये आयोजित करावयाच्या कार्यक्रमांचा तपशिल

| बाब | कार्यक्रमाचे स्वरुप |
|---|---|
| प्रचार प्रसिध्दी | १. पशुसंवर्धन पंधरवडा आयोजित करण्याचा हेतु पशुपालकांपर्यंत पोहचविण्यासाठी तसेच पशुपालकांचा सहभाग प्राप्त होण्यासाठी पशुवैद्यकीय दवाखाने, शासकीय कार्यालये, ग्रामपंचायत, कृषि उत्पन्न बाजार समिती, आठवडी बाजार ठिकाण इ. ठिकाणी नियोजित कार्यक्रमांचे प्रसिध्दी फलक लावण्यात यावे.<br>२. दृक व श्राव्य प्रसार माध्यमे तसेच समाज माध्यमे यांवर व्यापक प्रसिध्दी देण्यात यावी. |
| लसीकरण व जंत निर्मूलन | १. राज्यातील सर्व पशुधन साथ रोग प्रादुर्भावापासून बचाव होण्याकरिता तसेच त्यांच्यामध्ये रोगप्रतिकारक शक्ती निर्माण होण्याकरिता सर्व शासकीय पशुवैद्यकीय संस्थामार्फत त्यांच्या कार्यक्षेत्रातील सर्व पशुधनाकरिता १०० टक्के पात्र पशुधनास लाळखुरकुत, सांसर्गिक गर्भपात, लम्पी चर्मरोग, घटसर्प, फऱ्या, पीपीआर, आंत्रविषार इ. रोग प्रतिबंधक लसीकरण करण्यात यावे.<br>२. जंत निर्मूलन करण्याच्या दृष्टिने जंतनाशक औषधीचे वाटप करण्यात यावे.<br>३. बाह्य परोपजीवी निमुर्लनासाठी गोठा व परिसर स्वच्छता तसेच औषध फवारणी कार्यक्रम राबविणे. |
| गाई-म्हशींची वंधत्व तपासणी व उपचार शिबीरांचे आयोजन | १. पैदासक्षम गाई-म्हशी माजावर येऊन गाभण राहण्यासाठी त्यांच्यामधील वंधत्व निवारण करण्यासाठी पशुवैद्यकिय संस्थेच्या कार्यक्षेत्रामध्ये वंध्यत्व तपासणी व उपचार शिबीराचे आयोजन करण्यात यावे.<br>२. वंध्यत्व तपासणी करुन आवश्यक उपचार करण्यात यावे.<br>३. तदनंतर गर्भधारणा निश्चित होईपर्यंत त्याचा पाठपुरावा करण्यात यावा.<br>४. पशुधनातील माजाची लक्षणे ओळखण्याच्या दृष्टीने पशुपालकांना मार्गदर्शन करावे. |
| केंद्र व राज्य शासनाच्या विविध योजनांची माहिती देणे | १. पशुपालन व्यवसायास प्रोत्साहन देण्यासाठी केंद्र शासनाकडून राबविण्यात येणाऱ्या राष्ट्रीय पशुधन अभियान योजनेची माहिती देऊन सदर योजनेत जास्तीत जास्त लाभार्थ्यांनी सहभागी व्हावे यासाठी मार्गदर्शन करणे.<br>२. योजनेअंतर्गत अर्ज करण्यासाठी सहाय्य करणे.<br>३. प्रत्येक पशुवैद्यकीय दवाखान्यांच्या कार्यक्षेत्रातून राष्ट्रीय पशुधन अभियानात समावेश असलेल्या प्रत्येक घटकांमध्ये किमान १ लाभार्थी असावा यासाठी प्रयत्न करणे. |

| | |
|---|---|
| **दुध अनुदान योजना राबविताना येणाऱ्या अडचणींचे निराकरण** | राज्य शासनाकडून राबविण्यात येणाऱ्या गायीच्या दुधास रु.५/- प्रति लीटर अनुदान या योजनेची अंमलबजावणी करताना पशुपालकांना येत असलेल्या सर्व प्रकारच्या अडचणींचे निराकरण करण्यासाठी योजनेस सहभागी असलेल्या सर्व घटकांना मागदर्शन करणे/ निराकरण करणे. |
| **पशुधनास सकस आहार देण्यासाठी प्रोत्साहन देणे.** | १. पशुपालन व्यवसायात पशुचारा/ पशुखाद्याचे महत्व पशुपालकांना विषद करणे.<br>२. पशुचारा/ पशुखाद्य विषयक केंद्र व राज्य शासनाच्या योजनांची माहिती पशुपालकांना देऊन सदर योजनांमध्ये सहभागी होण्यास प्रोत्साहित करणे.<br>३. चारा उत्पादनास प्रोत्साहन देण्यासाठी राज्य शासनाने केलेल्या उपाययोजनांची माहिती पशुपालकांना देणे.<br>४. संबंधित गावातील पशुधनास आवश्यक असलेल्या चाऱ्याचे उत्पादन त्याच गावात करुन सदर गाव चारा उत्पादनात स्वयंपुर्ण करण्याच्या दृष्टीने शेतकरी पशुपालकांना प्रोत्साहित करणे. |
| **जनजागृती व प्रोत्साहन** | १. पशुसंवर्धन पंधरवड्याचा उद्देश साध्य होण्याच्या दृष्टीने प्रत्येक पशुवैद्यकीय दवाखान्यांच्या कार्यक्षेत्रात शिबीरे/कार्यशाळा/ व्याख्याने/ तज्ञांचे मार्गदर्शन/ यशस्वी पशुपालकांचे अनुभव कथन यासांरख्या उपक्रमांचे आयोजन करण्यात यावे.<br>२. महाराष्ट्र पशुधन मंडळाच्या अधिपत्याखालील वळू संगोपन केंद्र, वीर्य निर्मिती केंद्रास पशुपालकांच्या भेटी आयोजित करणे.<br>३. यशस्वी पशुपालकांच्या प्रकल्पांना भेट आयोजित करणे.<br>४. पशुपालन व्यवसायातील बॅकवर्ड व फॉरवर्ड लिंकेजस याबाबत मार्गदर्शन करणे.<br>५. उच्च वंशावळीचे पशुधन निर्मितीसाठी कृत्रिम रेतनाचे महत्व पशुपालकांना पटवून देऊन त्यासाठी प्रोत्साहित करणे. |
| **पशुगणना जनजागृती अभियान** | देशात २१ वी पशुगणना करण्यात येत असून त्यादृष्टीने सर्व पशुधनाची गणना केली जाईल यासाठी शेतकरी पशुपालक यांना पशुगणनेचे महत्व पटवून देणे तसेच पशुगणनेसाठी मार्गदर्शन करणे. |

..................................................